स्वातंत्र्य सैनिकांना शासकीय सेवेत वर्ग ३ आणि वर्ग ४ या पदांवर सेवाप्रवेशासाठी सवलत मिळणेबाबत स्वातंत्र्य सैनिकांची नातेवाईक अवलंबित व्यक्ती.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक: सीएनएस-१०८४/सीआर-१०३/सोळा-अ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक १० जानेवारी, १९८५.

पहा :- [१] शासन परिपत्रक ज्ञापन, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: सीएनएस-१०६५/४६५२/जे, दिनांक १२ ऑक्टोबर १९६५.

[२] शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: सीएनएस-१०८१/१/१६-अ, दिनांक २ मार्च १९८१.

शासन निर्णय :- स्वातंत्र्य सैनिकांना शासकीय सेवेत वर्ग ३ आणि वर्ग ४ मधील पदांवर भरतीसाठी शासनाने दिनांक १२ ऑक्टोबर १९६५ च्या परिपत्रकान्वये काही सवलती दिलेल्या आहेत. या सवलती मूलत: स्वातंत्र्य सैनिकांसाठीच आहेत. परंतु वार्धक्यामुळे किंवा आजारपण इत्यादी कारणांमुळे स्वत: स्वातंत्र्य सैनिक ह्या नोकरी विषयक सवलती घेण्यास अपात्र असतील त्यावेळी ते त्यांच्यावर अवलंबित असलेल्या जवळच्या एका नातेवाईकास या सवलतीचा फायदा घेण्यासाठी नामनिर्देशित करु शकतात.

२. स्वातंत्र्य सैनिकावर अवलंबून असलेली जवळची नातेवाईक व्यक्ती कोण याबाबत स्पष्ट खुलासा करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. ह्याबाबत साकल्याने विचार करुन शासन असे आदेश देत आहे की, स्वातंत्र्य सैनिकाशी खाली निर्देशित केलेले नाते असलेली व स्वातंत्र्य सैनिकावर अवलंबून असलेली व्यक्ती स्वातंत्र्य सैनिकाच्या जवळच्या नात्याची अवलंबित व्यक्ती गणण्यात येईल :-

स्वातंत्र्य सैनिकाची पत्नी, स्वातंत्र्य सैनिकाचा पती, मुलगा, अविवाहीत किंवा घटस्फोटीत मुलगी, सख्खा भाऊ, सख्खी अविवाहीत किंवा घटस्फोटीत बहिण, त्याचप्रमाणे सख्ख्या भावाचा किंवा बहिणीचा स्वातंत्र्य सैनिकावर अवलंबून असलेला मुलगा किंवा अविवाहीत वा घटस्फोटीत मुलगी.

३. वरीलपैकी नामनिर्देशित नातेवाईक व्यक्ती स्वातंत्र्य सैनिकावर पूर्णत: अवलंबित असली पाहिजे व तसे नामनिर्देशन पत्रात स्पष्ट केलेले असावे.

४. जर स्वातंत्र्य सैनिक हुतात्मा झाला असेल किंवा नामनिर्देशन करण्यापूर्वी त्याचे निधन झाले असेल त्या प्रकरणी अपवाद म्हणून त्याच्या विधवा पत्नीस परिच्छेद २ मध्ये नमूद केलेल्यापैकी स्वातंत्र्य सैनिकाच्या एका नातलगास नामनिर्देशित करण्याचा अधिकार राहील.

कृ. पा. प.

शा. म. मु. रोटा/एच-७०३[४, ५००-१-८५]

५. सर्व नियुक्ती अधिकाऱ्यांनी वरील आदेशांची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी अशी त्यांना विनंती आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

मुकुन्द स. मोकाशी,
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्र्यांचे खाजगी सचिव,
सर्व राज्यमंत्र्यांचे स्वीय सहाय्यक,
x प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
x प्रबंधक, मूळ न्याय-शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
x प्रबंधक, लोकायुक्त व उपलोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
x सचिव, महाराष्ट्र विधीमंडळ सचिवालय, मुंबई,
x संचालक, सैयायोजन, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
मंत्रालयीन विभागांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभागप्रमुख/कार्यालय प्रमुख,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सामान्य प्रशासन विभाग / स्वातंत्र्य सैनिक कक्ष

xपत्राने.

---

एच-७०३[४, ५००-२-८५]-अ.